उपजिल्हा रुग्णालय, रामटेक जि.नागपूर येथील दंतचिकित्सा विभागातील दंत शल्य चिकित्सक हे १ अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पदआ - २०१८ /प्र.क्र. २६७/आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: २८ सप्टेंबर ,२०१८.

वाचा -

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक -पदआ- २०१८/प्र.क्र.३९/आरोग्य -३, दिनांक - २१.०३.२०१८.
२) उपसंचालक,आरोग्य सेवा, नागपूर यांचे पत्र क्रमांक- आस्था/अस्थाई पदे/ रामटेक/१८, दिनांक- २५.०९.२०१८.

## शासन निर्णय-

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये उपजिल्हा रुग्णालय, रामटेक जि.नागपूर येथील दंत शल्य चिकित्सक,गट-ब या १ अस्थाई पदास त्या पदावर कार्यरत झाल्याच्या दिनांकापासून ते दि.२८.०२.२०१८ या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालय, आर्वी जि.वर्धा येथील सदर दंत शल्य चिकित्सक,गट-ब या १ अस्थाई पदास दि.०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१८-२०१९ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-आर-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०३ - ग्रामिण आरोग्य सेवा व विषम चिकित्सा
११०-५ - रुग्णालये व दवाखाने
(०१) - कुटीर रुग्णालये (२२१० ४६२४)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्रमांक,पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१,दिनांक-०५.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२७१८१९५१९३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.09.28 15:51:21 +05'30'

**(रो.दि.कदम - पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये - राज्यस्तर) मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
८. वैद्यकीय अधिक्षक,उपजिल्हा रुग्णालय, रामटेक जि. नागपूर.
९. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३)